**उत्सवांच्या प्रसंगी रस्त्यावर मंडप इत्यादी उभारण्यास परवानगी देण्यासाठी आयुक्त, महानगरपालिका यांना असलेल्या अधिकारानुसार परवानगी देण्यासाठी महानगरपालिकांनी मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
शासन परिपत्रक, क्रमांक याचिका २०१५/ सं.क्र. ८७८(१)/ नवि ३४
शहीद भगतसिंग चौक, मदाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
**दिनांक ६ जुलै, २०१५**

वाचा

१) मा. उच्च न्यायालयाने जनहित याचिका क्रमांक १७३/ २०१० सोबत सिव्हिल ॲप्लिकेशन १२४/२१०४ मध्ये दिनांक १३ मार्च, २०१५ व दिनांक २४ जून, २०१५ रोजी दिलेले आदेश.

प्रस्तावना

समारंभाच्या व उत्सवाच्या प्रसंगी रस्त्यावर उभारण्यात येत असलेल्या मंडपा संदर्भात व ध्वनी प्रदुषण (नियमन व नियंत्रण) नियम, २००० ची अंमलबजावणी करण्यासंदर्भात डॉ. महेश बेडेकर यांनी मा. उच्च न्यायालयात दाखल केलेल्या जनहित याचिका क्रमांक १७३/२०१२ सोबत सिव्हिल ॲप्लिकेशन क्रमांक १२४ /२०१४ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिनांक १३ मार्च, २०१५ व दिनांक २४ जून, २०१५ रोजी सविस्तर आदेश दिले आहेत. (सदर आदेशांची प्रत मुंबई उच्च न्यायालयाच्या संकेतस्थळावरून डाऊनलोड करून घेण्यात यावी.)

०२. मा. उच्च न्यायालयाने दिनांक १३ मार्च, २०१५ च्या आदेशातील परिच्छेद १ ते ७ मध्ये समारंभाच्या व उत्सवाच्या प्रसंगी रस्त्यावर उभारण्यात येत असलेल्या मंडपा संदर्भात सविस्तर विवेचन करून मुंबई महानगरपालिका अधिनियम, १९८८ च्या कलम ३१७ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २३४ अन्वये महानगरपालिकांच्या आयुक्तांना असलेल्या अधिकारासंदर्भात सदर आदेशाच्या परिच्छेद ८ व ९ मध्ये पुढील प्रमाणे आदेश दिले आहेत :-

8. “The Section 234 does not confer absolute power. The power conferred on the Commissioner is discretionary. The power cannot be exercised without the concurrence of the Commissioner of Police or the Superintendent of Police, as the case may be. The exercise of power without their concurrence will be bad in law. It is obvious that a permission under the provision cannot be granted if the temporary erection of booths or similar structures is likely to affect free movement of vehicular traffic. Permission to erect booths on the footpaths or footway cannot be granted if the same is likely to obstruct free movement of the pedestrians. It is obvious that the discretion cannot be exercised by granting permissions to erect booths or like structures on a very busy public streets having a large vehicular traffic. It cannot be exercised in relation to footpaths in localities having a large population and in respect of footpaths in the localities which are very crowded. The power cannot be used in relation to public streets including footpaths or footways near Railway stations/public bus stands/major auto rickshaw or taxi stands. It follows that such permissions cannot be granted if the grant of such permissions is likely to result into a major traffic congestion or is likely to cause obstruction to large number of pedestrians

in the use of footway. Such permissions cannot be granted on streets or footways in the vicinity of major hospitals and educational institutions. These cases are set out only by way of illustrations. This is not the exhaustive list of footpaths and streets in relation to which the discretionary power should not be exercised. While exercising the discretion under the said section, the Commissioner of the Municipal Corporations shall consider all such relevant factors.

9. Therefore, by way of ad interim relief, we direct that the discretionary power under the Section 234 to grant permission to erect temporary booths or similar structures on streets on account of festivals shall be exercised by the Commissioners subject to aforesaid constraints set out in paragraph 8 above. We also direct the Municipal Corporations to frame a policy for dealing with grant of such permissions in the light of what we have held above. The Policy shall be framed in two months from today. We also direct the Municipal Corporations to take immediate action of demolition in respect of the temporary booths/ platforms or similar structures erected on public streets without obtaining the requisite permission under Section 234. Such action shall be taken before the religious festivals/ functions are over. We also direct that whenever such permissions are granted, a condition shall be incorporated therein of prominently displaying the particulars of such permissions on the temporary booths or similar structures covered by Section 234 of the said Act of 1949."

०३. मुंबई महानगरपालिका अधिनियम, १९८८ च्या कलम ३१७ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २३४ अन्वये महानगरपालिकांच्या आयुक्तांना असलेल्या अधिकारासंदर्भात मा. उच्च न्यायालयाने दिनांक १३ मार्च, २०१५ व दिनांक २४ जून, २०१५ रोजी दिलेले आदेश विचारात घेता रस्त्यावर समारंभाच्या व उत्सवाच्या प्रसंगी मंडप किंवा असे कोणतेही अन्य बांधकाम तात्पुरते उभारण्यास परवानगी देण्यासाठी सर्व महानगरपालिकांनी धोरण तयार करणे आवश्यक असल्याने या संदर्भात तशा सविस्तर सूचना महानगरपालिकांना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन परिपत्रक

**प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून शासन पुढील प्रमाणे सूचना देत आहे:-**

(१) मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या कलम ३१७ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २३४ नुसार, ज्या क्षेत्रासाठी पोलीस आयुक्तांची नेमणूक करण्यात आली असेल अशा कोणत्याही क्षेत्रासाठी पोलीस आयुक्तांच्या किंवा त्याने नामनिर्देशित केलेल्या कोणत्याही अधिकाऱ्याच्या आणि अन्यत्र जिल्हा दंडाधिकाऱ्याच्या किंवा त्याने नामनिर्देशित केलेल्या कोणत्याही अधिकाऱ्याच्या सहमतीने आयुक्तास, कोणत्याही रस्त्यावर समारंभाच्या प्रसंगी मंडप किंवा असे कोणतेही अन्य बांधकाम तात्पुरते उभारण्यास लेखी परवानगी देण्याचे अधिकार देण्यात आलेले आहेत. आयुक्तांनी सदर अधिकाराचा वापर करताना मा. उच्च न्यायालयाने जनहित याचिका क्रमांक १७३/ २०१० सोबत सिव्हिल ॲप्लिकेशन क्रमांक १२४ / २०१४ मध्ये दिनांक १३.३.२०१५ रोजी दिलेल्या आदेशामधील परिच्छेद ८ मधील दिशानिर्देशांच्या सापेक्ष राहूनच अशी परवानगी देण्यात यावी.

(२) मा. उच्च न्यायालयाने जनहित याचिका क्रमांक १७३/ २०१० सोबत सिव्हिल ॲप्लिकेशन क्रमांक १२४ / २०१४ मध्ये दिनांक १३.३.२०१५ व दिनांक २४ जून, २०१५ रोजी दिलेले आदेशामधील मा.

उच्च न्यायालयाने केलेले विवेचन लक्षात घेवून मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या कलम ३१७ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २३४ नुसार रस्त्यावर समारंभाच्या व उत्सवाच्या प्रसंगी मंडप किंवा असे कोणतेही अन्य बांधकाम तात्पुरते उभारण्यास परवानगी देण्यासाठी आयुक्त, महानगरपालिका यांना असलेल्या अधिकारांचा वापर करण्याकरिता महानगरपालिकांनी धोरण तयार करून ते मार्गदर्शक सूचनांच्या स्वरूपात १५ दिवसात प्रसिध्द करण्यात यावे. सदर धोरण तयार करताना डॉ. एम.इस्माईल फारूकी विरुध्द भारत सरकार या प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशातील परिच्छेद ८० व ८१ चा विचार करण्यात यावा. ( मा. उच्च न्यायालयाचे दिनांक २४.६.२०१५ च्या आदेशातील परिच्छेद ८) सदरचे धोरण सर्व समाजाच्या व धर्मांच्या उत्सावांना लागू राहील. सदर धोरणास महानगरपालिकेच्या संकेतस्थळावर प्रसिध्दी देण्यात यावी. तसेच, या धोरणामध्ये वेळोवेळी आवश्यकतेनुसार सुधारणाही करण्यात याव्यात. महानगरपालिकेने सदरचे धोरण प्रतिज्ञापत्राव्दारे मा. उच्च न्यायालयात विहीत कालावधीत सादर करण्यात यावे. (ठाणे महानगरपालिकेने या संदर्भात ठरविलेली मार्गदर्शक तत्वे-२०१५ ठाणे महानगरपालिकेच्या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत)

(३) मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या कलम ३१७ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २३४ अन्वये तात्पुरते मंडप किंवा असे कोणतेही अन्य बांधकाम यांना परवानगी देताना, परवानगीचा तपशील संबंधित मंडप किंवा असे कोणतेही अन्य बांधकामांच्या दर्शनीभागावर ठळकपणे लावण्याची अट अशा परवानगी आदेशामध्ये घालण्यात यावी.

(४) मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या कलम ३१७ व महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २३४ अन्वये आवश्यक मंजुरी न घेता सार्वजनिक रस्त्यांवर उभारण्यात आलेले तात्पुरते बुथ / मंडप किंवा असे कोणतेही अन्य बांधकाम काढून टाकण्यात यावे. अशी कार्यवाही शक्यतो धार्मिक उत्सव / कार्यक्रमांपूर्वी करण्यात यावी.

(५) आयुक्तांनी रस्त्यावर समारंभाच्या व उत्सवाच्या प्रसंगी मंडप किंवा असे कोणतेही अन्य बांधकाम तात्पुरते उभारण्यास परवानगी देताना नागरिकांच्या मुलभूत अधिकारावर विपरीत परिणाम होणार नाही याची दक्षता घ्यावी.

(६) दिनांक २४.६.२०१५ च्या आदेशातील परिच्छेद क्रमांक १५(v) नुसार जिल्हाधिकाऱ्यांनी प्रत्येक महानगरपालिका क्षेत्रासाठी तहसीलदार दर्जापेक्षा कमी नसलेल्या अधिकाऱ्यांचा गट नियुक्त करावायाचा आहे. अशा गटाने उत्सवांच्या कालावधीत मुख्य उत्सव सुरू होण्यापूर्वी किमान ७ दिवस अगोदर रस्त्यावर समारंभाच्या व उत्सावाच्या प्रसंगी उभारण्यात आलेल्या तात्पुरत्या मंडपांना किंवा अन्य बांधकामाना भेट देवून सदरच्या मंडपावर परवानगीचा तपशील दर्शनीभागावर ठळकपणे लावण्यात आला आहे किंवा नाही हे पहावे. असा तपशील मंडपाच्या दर्शनीभागावर ठळकपणे लावला नसल्यास सदर मंडप अनधिकृत आहे असे समजून सदर बाब संबंधित महानगरपालिकेच्या आयुक्तांच्या नजरेस आणून देण्यात यावी. त्यावर महानगरपालिका आयुक्तांनी नियमानुसार सदरहू अनाधिकृत मंडपा काढून टाकण्याबाबत कार्यवाही सुरू करावी.

(७) रस्त्यावर समारंभाच्या व उत्सवाच्या प्रसंगी मंडप किंवा असे कोणतेही अन्य बांधकाम तात्पुरते उभारल्यामुळे उपद्रव होत असल्यास फौजदारी प्रक्रिया संहिता १९७३ चे कलम १३३ अन्वये तक्रार दाखल करावी.

(८) आयुक्त, महानगरपालिका, महानगरपालिकेचे अधिकारी/ कर्मचारी व जिल्हाधिकाऱ्यांनी नियुक्त केलेल्या गटास या प्रकरणी अंमलबजावणी करताना कोणत्याही प्रकारची बाधा निर्माण झाल्यास

त्यांनी संबंधित स्थानिक पोलीस स्टेशनकडे अर्ज केल्यास, संबंधित पोलीस स्टेशनने त्यांना आवश्यकती सुरक्षा पुरविण्यात यावी.

(९) रस्त्यावर समारंभाच्या व उत्सवाच्या प्रसंगी मंडप किंवा असे कोणतेही अन्य तात्पुरते बांधकामाबाबत होणाऱ्या उपद्रवाबाबत नागरिकांना तक्रारी करता याव्यात यासाठी प्रत्येक महानगरपालिकेने तक्रार निवारण प्रणाली प्रस्थापीत करावी. ज्यामध्ये तक्रार नोंदविण्यासाठी टोल फ्री क्रमांक, एस.एम.एस सुविधा, ई-मेल इत्यादी सुविधा उपलब्ध करून देण्यात याव्यात. या उपलब्ध करून दिलेल्या सुविधांना स्थानिक पातळीवर व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी. ज्यामुळे सर्वसामान्य नागरिकांना तक्रार करणे सोपे होईल. निनावी तक्रारी प्राप्त झाल्यास त्याची नोंद घेवून त्यावर कार्यवाही करण्यात यावी. प्राप्त होणाऱ्या तक्रारींची नोंद घेण्यासाठी एक नोंदवही ठेवून त्यामध्ये तक्रारीची व त्या तक्रारीवर करण्यात आलेल्या कार्यवाहीची नोंद घेण्यात यावी.

०२. सर्व महानगरपालिकांनी उपरोक्त सूचनांचे व मा. उच्च न्यायालयाने या प्रकरणी दिनांक १३ मार्च, २०१५ व दिनांक २४ जून, २०१५ मध्ये दिलेल्या आदेशांचे पालन करावे व यासंदर्भात विहीत कालावधीत कार्यवाही करून केलेल्या कार्यवाहीचा अहवाल मा. उच्च न्यायालयास व शासनास सादर करण्यात यावा.

०३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१५०७०७१११६१२४७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhaker
Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2015.07.07 11:18:20 +05'30'

**(सुधाकर ज्ञा. बोबडे)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव (सर्व). मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, (सर्व ) मंत्रालय, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अप्पर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अप्पर मुख्य सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य पोलिस, मुंबई.
९. प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.सर्व विभागांचे अ.मु.स. / प्र.स. / सचिव, मंत्रालय, मुंबई
११.आयुक्त तथा संचालक, नगर परिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
१२.सर्व विभागीय आयुक्त.
१३.आयुक्त, सर्व महानगरपालिका.
१४.सर्व जिल्हाधिकारी.
१५.सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई
१६.निवडनस्ती (नवि-३४)